# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन आदेश क्रमांकः संकीर्ण - १०१८/प्र.क्र.१२२/१४-ब

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ नोव्हेंबर, २०१८

**संदर्भ** - समक्रमांकाचे दिनांक १२.१०.२०१८ रोजीचे आदेश

## शासन आदेश

सरळसेवा कक्ष अधिकारी तसेच पदोन्नत कक्ष अधिकारी यांनी मंत्रालयीन कक्ष अधिकारी संवर्गाच्या सन १९८६ ते २००० या कालावधीतील दिनांक १ जानेवारी रोजीच्या परस्पर सेवा ज्येष्ठतेबाबत मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे याचिका दाखल केल्या होत्या. मा. उच्च न्यायालयाने यावर एकत्रितरित्या दिनांक ०६.०८.२०१८ रोजी निर्णय दिला आहे. मा.उच्च न्यायालयाने आपल्या दिनांक ०६.०८.२०१८ रोजीच्या निर्णयास आठ आठवड्यांची स्थगिती दिली होती. यासंदर्भात पदोन्नत अधिका-यांकडून मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका (SLP) क्र. २५१८१/२०१८ दाखल करण्यात आली असून, यावर दिनांक ०१.१०.२०१८ रोजी झालेल्या सुनावणीत मा.सर्वोच्च न्यायालयाने मा.उच्च न्यायालयाच्या दिनांक ०६.०८.२०१८ च्या आदेशास स्थगिती दिलेली नाही. सबब, मा.उच्च न्यायालयाच्या दिनांक ०६.०८.२०१८ रोजीच्या आदेशास अनुसरून मंत्रालयीन कक्ष अधिकारी त्याच बरोबर अवर सचिव, उपसचिव व सह सचिव संवर्गाच्या दिनांक ०१.०१.१९८६ पासूनच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकित करण्याबाबत कार्यवाही करावयाची आहे. याकरिता सा.प्र.वि. शा. आ. दिनांक १२.१०.२०१८ अन्वये, अवर सचिव, सा.प्र.वि./कार्यासन १४ यांच्या पर्यवेक्षिय नियंत्रणाखाली एक गट (Cell) स्थापन करण्यात आला आहे .

२. सा.प्र.वि. शा. आ. दिनांक १२.१०.२०१८ अन्वये नियुक्त गटामध्ये (Cell) श्रीमती मनिषा टिळक, सहायक कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग यांच्या सेवा या विभागाकडून तात्पुरत्या स्वरूपात अधिग्रहित करण्यात येत आहेत.

३. श्रीमती टिळक यांच्या सेवा प्रथमत: दिनांक २९.११.२०१८ पासून पुढील ०३ महिन्यांच्या कालावधीसाठी या विभागाकडून तात्पुरत्या स्वरूपात अधिग्रहीत करण्यात येत असून, आवश्यकतेनुसार सदर कालावधीत वाढ करण्यात येईल. श्रीमती टिळक यांच्या सेवा तात्पुरत्या स्वरूपात अधिग्रहीत करण्यात येणार असल्याने त्यांच्या वेतनादी विषयक बाबी महसूल व वन विभागाकडून हाताळण्यात येतील.

४. श्रीमती टिळक यांनी इतर कोणत्याही आदेशाची प्रतिक्षा न करता दिनांक २९.११.२०१८(म.पू.)रोजी सा.प्र.वि./कार्यासन १४ ब (दालन क्र. ५५७, ५ वा मजला, विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई) येथे रुजू अहवाल सादर करावा. सदरचे आदेश हेच कार्यमुक्ततेचे आदेश असून महसूल व वन विभागाने स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याची आवश्यकता नाही. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार, मंत्रालयीन कक्ष अधिकारी त्याच बरोबर अवर सचिव, उप सचिव व सह सचिव संवर्गाच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकित करावयाच्या असल्याने, श्रीमती टिळक यांना कार्यमुक्त न करण्यासंदर्भात महसूल व वन विभागाच्या विनंतीची दखल घेतली जाणार नाही.

त्याचप्रमाणे सदर प्रयोजनासाठी श्रीमती टिळक यांनी रूजू होण्यास हयगय केल्यास त्यांच्या विरूध्द शिस्तभंगविषयक कारवाई प्रस्ताविण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११२८१२३६३२३४०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.11.28 12:43:38 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

श्रीमती मनिषा टिळक, सहायक कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (सेवा),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२) अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग. मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
३) सह/उप सचिव (आस्थापना), सामान्य प्रशासन विभाग/महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
४) निवड नस्ती / संग्रहार्थ.